**केंद्र पुरस्कृत एकात्मिक बाल विकास सेवा योजना अंतर्गत नागरी व ग्रामीण / आदिवासी क्षेत्रातील अंगणवाडी केंद्र इमारत भाडे वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.३०७/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १७ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-** (१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय, क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.३०७/का.६, दिनांक १७.१.२०२०.
(२) केंद्र शासनाच्या सक्षम अंगणवाडी बाबतच्या दिनांक १.८.२०२२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना
(३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/अं.वाडी/का-७/सुधारित भाडे दर/३०८३/२०२३-२४, दिनांक २४.७.२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पुनर्संरचना अंतर्गत नागरी व ग्रामीण / आदिवासी क्षेत्रातील अंगणवाडी केंद्र इमारत भाडे वाढ करण्यास वाचा क्र.१ येथील महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय, क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.३०७/का.६, दिनांक १७.१.२०२० अन्वये परवानगी देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सक्षम अंगणवाडी व पोषण २.० बाबत दिलेल्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी भाडे दरामध्ये वाढ करण्यात आली आहे. सदर दरवाढ राज्यात लागु करण्याची बाब विचाराधीन होती. त्याचप्रमाणे एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत भाडे तत्त्वावरील कार्यरत अंगणवाडयांमध्ये मुलभुत सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक-१ येथील शासन निर्णयामधील नमूद अटी व शर्तीमध्ये सुधारणा करणे आवश्यक असल्याने तसेच सुधारित भाडे वाढ करणे याकरिता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी संदर्भाधिन क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक १७.१.२०२० येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन केंद्र पुरस्कृत एकात्मिक बाल विकास सेवा योजन अंतर्गत नागरी, ग्रामीण व आदिवासी क्षेत्रातील अंगणवाडी केंद्र इमारत भाडे वाढ करणेबाबत सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक १७.१.२०२० रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत नागरी व ग्रामीण / आदिवासी क्षेत्रातील अंगणवाडी केंद्र इमारत भाडे वाढ करण्यास खालीलप्रमाणे नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(१) ग्रामीण/आदिवासी क्षेत्र - रू. २,०००/- प्रतिमाह

(२) नागरी क्षेत्र (नगरपालिका/नगर परिषद/नगरपंचायत/ महानगरपालिका)-रू. ६,०००/- प्रतिमाह

(३) महानगर (Metropolitan)- रू. ८,०००/-प्रतिमाह

अटी व शर्ती :-

**अ) ग्रामीण/आदिवासी क्षेत्र:-**

ग्रामीण व आदिवासी क्षेत्रात अंगणवाडी / मिनी अंगणवाडी इमारतींचे निर्धारित केलेले मासिक भाडे रू. २,०००/- अनुज्ञेय राहील. सदरचे मासिक भाडे हे स्थानिक कर, मेंटेंनन्स, इतर अनुषंगीक कर तसेच वीजबिलासह निर्धारित राहील.

**ब) नागरी क्षेत्र:- (नगरपंचायत / नगरपालिका/नगरपरिषद/ महानगरपालिका)**

नगरपंचायत, नगरपालिका / नगरपरिषद व महानगरपालिका (महानगर Metropolitan मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून) यांचेबाबतीत अंगणवाडी भाडे संदर्भात खालीलप्रमाणे निकष राहतील.

| क्षेत्रफ़ळ | निकष |
|---|---|
| **३०० ते ५०० चौ.फ़ूट** | १) अंगणवाडी केंद्राकरिता निर्धारित केलेले मासिक भाडे हे स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह रु.६,०००/- अनुज्ञेय राहील. शौचालय, पिण्याचे पाणी, सांडपाण्याची सोय इत्यादी मुलभूत सुविधा उपलब्ध असणे आवश्यक राहील.<br>२) “अ”,”ब” व “क” वर्ग महानगरपालिका क्षेत्राच्या बाबतीत वर नमुद मुलभूत सुविधापैकी शौचालय सुविधा उपलब्ध होत नसल्यास रु. ५,०००/- प्रतिमाह भाडे तर उर्वरित नागरी क्षेत्राकरिता (“ड” वर्ग महानगरपालिका / नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायत) रु. ४०००/- प्रतिमाह भाडे अदा करण्यात यावे. मात्र अंगणवाडी केंद्रांच्या नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. सदरचे भाडे हे स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगीक कर तसेच वीजबिलासह अनुज्ञेय राहील. |
| २०० ते ३०० चौ. फुट पर्यंत | १) अंगणवाडी केंद्राकरिता ३०० ते ५०० चौ फ़ूट जागा उपलब्ध होत नसल्यास २०० ते ३०० चौ. फ़ूटपर्यंत क्षेत्रफ़ळाची इमारत अंगणवाडी करिता भाडेतत्वावर घेता येईल. त्याकरिता प्रतिमाह रु. ३०००/- (स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह) अनुज्ञेय राहील.<br>२) त्याकरिता शौचालय सुविधा इमारतीमध्ये अथवा नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. |
| १८० ते २०० चौ. फ़ूट पर्यंत | १) अंगणवाडी केंद्राकरिता २०० ते ३०० चौ फ़ूट क्षेत्रफ़ळाची इमारत देखील उपलब्ध होत नसल्यास १८० ते २०० चौ. फ़ूट पर्यंत क्षेत्रफ़ळाची इमारत अंगणवाडी करिता भाडेतत्वावर घेता येईल. त्याकरिता प्रतिमाह रु. २०००/- (स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह) अनुज्ञेय राहील.<br>२) त्याकरिता शौचालय सुविधा इमारतीमध्ये अथवा नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. |

क) **महानगर (Metropolitan):-**

महानगर Metropolitan मुंबई शहर व मुंबई उपनगर करिता अंगणवाडी भाडे संदर्भात खालीलप्रमाणे निकष राहतील.

| क्षेत्रफ़ळ | निकष |
|---|---|
| **३०० ते ५०० चौ.फ़ूट** | १) अंगणवाडी केंद्राकरिता निर्धारित केलेले मासिक भाडे हे स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह रु.८,०००/- अनुज्ञेय राहील. शौचालय, पिण्याचे पाणी, सांडपाण्याची सोय इत्यादी मुलभूत सुविधा उपलब्ध असणे आवश्यक राहील. शौचालयाची सुविधा इमारतीमध्ये उपलब्ध नसल्यास नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. |
| **२०० ते ३००** चौ. फुट पर्यंत | १) अंगणवाडी केंद्राकरिता ३०० ते ५०० चौ फ़ूट जागा उपलब्ध होत नसल्यास २०० ते ३०० चौ. फ़ूट पर्यंत क्षेत्रफ़ळाची इमारत अंगणवाडी करिता भाडेतत्वावर घेता येईल. त्याकरिता प्रतिमाह रु. ६,०००/- (स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह) अनुज्ञेय राहील.<br>२) त्याकरिता शौचालय सुविधा इमारतीमध्ये अथवा नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. |
| १८० ते २०० चौ. फ़ूट पर्यंत | १) अंगणवाडी केंद्राकरिता २०० ते ३०० चौ फ़ूट क्षेत्रफ़ळाची इमारत देखील उपलब्ध होत नसल्यास १८० ते २०० चौ. फ़ूट पर्यंत क्षेत्रफ़ळाची इमारत अंगणवाडी करिता भाडेतत्वावर घेता येईल. त्याकरिता प्रतिमाह रु. ४०००/- (स्थानिक कर, मेंटेनंस, इतर अनुषंगिक कर तसेच वीजबिलासह) अनुज्ञेय राहील.<br>२) त्याकरिता शौचालय सुविधा इमारतीमध्ये अथवा नजीकच्या परिसरात सार्वजनिक शौचालय असणे आवश्यक राहील. |

२. उपरोक्तप्रमाणे अंगणवाडी केंद्रासाठी इमारत भाडेतत्वावर घेताना इमारतीचा ताबा घेण्यापूर्वी इमारत योग्य व पुरेशी असल्याचे तसेच वरीलप्रमाणे नमूद मुलभूत सुविधा तपासण्यासाठी संबंधीत अंगणवाडीच्या लाभार्थी पालकांची पंचकमिटी नेमून त्यांचे प्रमाणपत्र घेण्यात यावे.

३. अंगणवाडी केंद्राकरिता वीज सुविधा उपलब्ध असलेली इमारत भाडेतत्वावर घेणे अनिवार्य राहील.

४. सदरची भाडेवाढ सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून लागू राहील.

५. वरीलप्रमाणे नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे तंतोतंत पालन होत असल्याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०८१७१४५३२७८६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb40821739612 8e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2023.08.21 17:09:10 +05'30'

**(वि.रा.ठाकूर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,

३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,

४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

५) प्रधान सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

६) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई,

७) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई,

८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

९) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग,

१०) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद,

११) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी),

१२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१ / २, मुंबई/ नागपूर,

१३) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ /२ , मुंबई / नागपूर,

१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

१७) वित्त विभाग, (व्यय-६/अर्थसंकल्प-७)मंत्रालय, मुंबई,

१८) नियोजन विभाग, (का.१४७२),मंत्रालय, मुंबई,

१९) निवड नस्ती (कार्यासन ६).